सन २०२३-२४ करीता तालीम, कुस्ती केंद्राचा विकास करण्यासाठी आर्थिक सहाय्य वितरीत करण्याबाबत. (२२०४- ५४७५),

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडासू १४२४/प्र.क्र.७८ /क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/क्रीयुसे-१, दि.१ मार्च, २०१४.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. संकीर्ण -३०२३/प्र.क्र. १४९/क्रीयुसे-१, दि.१ डिसेंबर , २०२३.
३) सहसंचालक,क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/ताकुकेंवि/अनुदान/२०२०-२१/५७/का-६/ दि. ७/९/२०२२

**प्रस्तावना :-** महाराष्ट्रात कुस्ती कलेची परंपरा जोपासण्यासाठी तालीम व आखाड्यांचे योगदान महत्वाचे आहे. ग्रामीण व शहरी भागात कुस्ती खेळांची विशेष आवड आहे. हा खेळ प्रामुख्याने माती व गादी विभागात खेळला जातो. ग्रामीण भागात मातीचा आखाडा / तालीम व शहरी भागात तालीम / कुस्ती केंद्र यांची विशेष ओळख सर्वत्र आहे. या संदर्भातील सविस्तर कार्यपध्दती संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ अन्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने तालीम कुस्ती केंद्राचा विकास करण्यासाठी विविध सुविधा पुरविणे या योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सुधारित अदांजानुसार अर्थसंकल्पीत करण्यात आलेली तरतूदीतून संदर्भ क्र.२ येथील संस्थेस विहीत अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सन २०२३-२४ या वर्षाकरिता मागणी क्रमांक ई-३, २२०४ - क्रीडा व युवक सेवा, १०४ - क्रीडा व खेळ, (०८) खेळ व खेळाडूंना सहाय्य, (०८) (०३) तालीम कुस्ती केंद्राचा विकास करण्यासाठी विविध सुविधा पुरविणे (२२०४ ५४७५), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सुधारित अर्थसंकल्पीय तरतूदीनूसार वितरणासाठी उपलब्ध तरतुदीमधून "रामदास लोकजागृती व्यायामशाळा, गणेशवाडी ता.शिरुर अंनतपाळ जि. लातूर या संस्थेस तालीम कुस्ती केंद्राच्या जुन्या तालमीची दुरुस्तीकरिता अनुज्ञेय रु. ७.०० लक्ष( अक्षरी रुपये सात लक्ष फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यात येत असून, सदर निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ मधील बाब क्र.३ अनुदान मंजुरीच्या अटी मधील अटींनुसार कार्यवाही करावी. रामदास लोकजागृती व्यायामशाळा, गणेशवाडी ता.शिरुर अंनतपाळ जि. लातूर या संस्थेस अनुदान वितरीत झाल्यानंतर प्रकल्प पुर्णत्वाचा दाखला प्रकल्पाच्या छायाचित्र व उपयोगिता

प्रमाणपत्रासह लवकरात लवकर व कमाल १ वर्षाच्या कालमर्यादेत सादर करणे बंधनकारल राहील, अन्यथा वितरीत अनुदान शासनाच्या प्रचलित दंडनीय व्याज दराने अनुदान वितरीत झाल्याच्या दिनांकापासुन वसुल करण्यात येईल, ही अट मान्य असल्याचे हमीपत्र प्रतिज्ञापत्राद्वारे संबंधित संस्थेकडून घेण्यात यावे. संबधित संस्थेने प्रतिज्ञापत्र संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्याकडे जमा करण्यात आल्यानंतर खालील अटींच्या अधीन राहून अनुदान अदा करण्यात यावे.

२.१ संबधित संस्थेने स्वहिस्सा म्हणून अंदाजपत्रकीय रक्कम/एकुण खर्चाच्या २५% रक्कम प्रथम स्वत: खर्च करणे आवश्यक राहील .

२.२. संबंधित संस्थेने मंजूर अनुदान बाबीवर २५% स्वहिस्सा रक्कम प्रथम खर्च केल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्याबाबतच्या बांधकाम प्रगती अहवाल, सदर बांधकामांच्या सद्यस्थितीतील फोटोसह सनदी लेखापालाच्या स्वाक्षरीने खर्चाचे विवरणपत्र सादर केल्यानंतरच संचालनालयाकडून संबंधित संस्थेस मंजूर अनुदान रक्कम एकरकमी अदा करण्यात यावी.

२.३ संस्थेने दिलेल्या मुदतीत काम पुर्ण करून विहित नमुन्यात काम पुर्णत्वाचा दाखला सादर करणे आवश्यक राहील. तसेच, बांधकाम पुर्णत्वाबाबत विविध बाजूकडील रंगीत फोटोसह सनदी लेखापालाच्या स्वाक्षरीने खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र व लेखा विवरणपत्र संबधित जिल्हा क्रीडा अधिकारी/संचालनालयास सादर करणे बंधनकारक आहे.

३. वित्त विभाग दिनांक ४.३.२०२४ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी / लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, २२०४ - क्रीडा व युवक सेवा, १०४ - क्रीडा व खेळ, (०८) खेळ व खेळाडूंना सहाय्य, (०८) (०३) तालीम कुस्ती केंद्राचा विकास करण्यासाठी विविध सुविधा पुरविणे (२२०४ ५४७५), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४२०५६३६६९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.14 21:12:40 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य .विधानमंडळ, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहायक मुंबई.
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
९. उपसंचालक,क्रीडा व युवक सेवा, लातूर विभाग, लातूर (क्रीडसंचालनालयामार्फत)
१०. जिल्हा क्रीडा अधिकारी, लातूर (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. जिल्हा कोषाधिकारी , लातूर (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१३. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती क्रीयुसे-१